# महाराष्ट्र शासन

**क्रमांक-बदली १२१७/प्र.क्र.८८ /का.१४२७**
**नियोजन विभाग,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २४ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :- या विभागाचे समक्रमांकाचे दिनांक ३१ मे, २०१७ चे आदेश.**

## कार्यालयीन आदेश

विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ३१/५/२०१७ रोजीच्या आदेशांन्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिका-यांच्या नियतकालिक / मुदतपूर्व बदल्या करण्यात आल्या आहेत. त्यापैकी खाली नमूद अधिका-यांना संबंधित कार्यालयप्रमुखांनी अद्यापपावेतो कार्यमुक्त केलेले नाही.

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व पदनाम | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्री.प्र.सु.भामरे, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर |
| २ | श्री.भा.ज.वायाळ, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, बुलढाणा | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती जिल्हाधिकारी कार्यलय, वाशिम |
| ३ | श्रीमती मु.वि.साईनकर, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, पुणे | सांख्यिकी अधिकारी, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे |
| ४ | श्री.प्र.त्र्यं.पोळ, संशोधन अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | संशोधन अधिकारी (इआ्संके), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई |
| ५ | श्री.ज्ञा.बा.खडतकर, नियोजन अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर |
| ६ | श्री.चं.प्र.पावसे, संशोधन अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे | संशोधन अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| ७ | श्रीमती नि.च.जोशी, सांख्यिकी अधिकारी, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, पुणे |
| ८ | श्री.अ.अ.दुधगांवकर, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, पालघर | संशोधन अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे |

२. उपरोल्लिखित अधिकाऱ्यांना या आदेशाच्या दिनांकापासून त्यांच्या नावासमोर (स्तंभ क्रमांक ३) दर्शविल्यानुसार त्या-त्या ठिकाणी रुजू होण्याकरीता सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या (स्तंभ क्रमांक २) पदावरुन कार्यमुक्त करण्यात येत आहे. तसेच, उपरोक्त सर्व अधिकारी कार्यमुक्त झाले आहेत, असे समजण्यात यावे.

३. हे आदेश तात्काळ अमंलात येतील. सदर आदेशाची अमंलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

(१) आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित कार्यालयाने पर्यायी अधिकारी हजर होण्याची वाट न पाहता उपरोक्त अधिकाऱ्यांना दिनांक ३१ ऑगस्ट, २०१७ (म.नं.) पर्यंत कार्यमुक्त करावे.

(२) उपरोक्त अधिकारी त्यांच्या संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाधिन काळ ठरवून; काम न देता व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित कार्यालयाच्या आस्थापना अधिकाऱ्याला जबाबदार ठरवण्यात येईल.

(३) सदर आदेशाची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे, उपरोक्त सर्व अधिकाऱ्यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंत किंवा दिनांक ३१ ऑगस्ट, २०१७ (म.नं.) पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे. दिनांक १ सप्टेंबर, २०१७ (म.पू.) पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या कार्यालयातून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या कार्यालयात हजर झाल्यानंतर बदलीनंतरच्या कार्यालयाने काढावे व त्याबाबतचा अहवाल विभागास सादर करावा. दिनांक १ सप्टेंबर, २०१७ पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तिशः जबाबदार धरण्यात येईल. तसेच, संबंधित कोषागार अधिकाऱ्यांनीही सदर आदेशानुसार कार्यमुक्त केलेल्या अधिका-यांचे दिनांक ३१ ऑगस्ट, २०१७ (म.नं.) नंतरचे वेतन देयक पारित करु नये, अशा सूचना देण्यात येत आहेत.

परिच्छेद क्रमांक १ मधील विवरणपत्रात नमुद केलेल्या सर्व अधिकाऱ्यांनी आपल्या बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे, तसेच त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश प्रधान सचिव (नियोजन) यांचे मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१७०८२४१२५४४८१९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2017.08.24 17:04:23 +05'30'

**( वनिता ना.जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरिक्षा),महाराष्ट्र-१ व २, मुंबई/ नागपूर.

२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
३) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती.
४) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
६) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
८) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, पालघर / बुलढाणा/ पुणे / वाशिम/ गडचिरोली/ नागपूर/ चंद्रपूर
९) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, जव्हार, जि.पालघर / गडचिरोली
१०) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (सर्व)
११) संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पालघर / बुलढाणा/ पुणे / वाशिम/ गडचिरोली/ नागपूर/ चंद्रपूर
१३) संबंधित अधिकारी,
१४) निवड नस्ती.